अवर सचिव पदावरुन उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : उसप-१३१७/प्र.क्र.५/का.१४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ०२.०६.२०१७

**आदेश**

खालील अवर सचिवांना या आदेशाच्या दिनांकापासून उप सचिव पदावर तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ ५ मध्ये दर्शविण्यात आलेल्या विभागामध्ये करण्यात येत आहे :-

| अ. क्र. | अवर सचिवांचे नांव | जाती प्रवर्ग | सध्याचा विभाग | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री.म.द.जाधव | अ.ज. | ग्राम विकास व जलसंधारण विभाग | ग्राम विकास व जलसंधारण विभाग |
| २ | श्री.ब.शे.मांडवे | अ.ज. | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग | कौशल्य विकास व उद्योजकता विभाग |
| ३ | श्री.अ.ना.वळवी | अ.ज. | सामान्य प्रशासन विभाग | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| ४ | श्री.प्र.ब.सुरवसे | अ.ज. | सार्वजनिक बांधकाम विभाग | वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग |
| ५ | श्रीमती छाया कि.वडते | वि.जा. (अ) | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ६ | श्री.श्या र.चौरे | अ.ज. | अल्पसंख्याक विकास विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ७ | श्री.अ.ता.उईके | अ.ज. | सार्वजनिक आरोग्य विभाग | कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग |
| ८ | श्री.वि.रा.ठाकूर | अ.ज. | सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| ९ | श्री.सा.अ.पठाण | अ.ज. | शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | परि.२ प्रमाणे |
| १० | श्री.प्र.पुं.बडगेरी | खुला | गृहनिर्माण - प्रतिनि - (शिवशाही पुनर्वसन) | उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग |
| ११ | श्री.कै.म.बधान | खुला | सार्वजनिक बांधकाम विभाग | नगर विकास विभाग |
| १२ | श्रीमती गीता रा. कुलकर्णी | खुला | पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | सामान्य प्रशासन विभाग |
| १३ | श्री.उ.र.दहिफळे | भ.ज.(ड) | वित्त विभाग | जलसंपदा विभाग |

२. श्री.सा.अ.पठाण, अवर सचिव यांचे उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नतीनंतरच्या पदस्थापनेचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. सदर अधिकाऱ्यांची उप सचिव पदावरील तदर्थ पदोन्नती त्यांच्याविरुध्द आदेशाच्या दिनांकापर्यंत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही या धारणेच्या अधीन तसेच खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे:-

(अ) सदर तदर्थ पदोन्नती प्रथम अकरा महिने किंवा सामान्य प्रशासन विभागाकडून निवडसूचीवरील नियमित उप सचिव नियुक्त होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल त्या कालावधीकरिता असेल.

(ब) प्रतिनियुक्तीवर असलेले ज्येष्ठ अधिकारी यांचे प्रत्यावर्तन झाल्यानंतर त्यांच्यासाठी उप सचिव संवर्गात रिक्त पद उपलब्ध नसल्यास या आदेशातील कनिष्ठतम अधिकाऱ्यांला पदावनत करण्याच्या अधीन सदर तदर्थ पदोन्नत्या देण्यात येत आहेत.

(क) या तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(ड) मागास प्रवर्गातील अधिकाऱ्यांची पदोन्नती सदर अधिकाऱ्यांचे जातवैधता प्रमाणपत्र संबंधित जातपडताळणी समितीने निर्गमित केले आहे या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

४. सदर उप सचिव पदावरील पदोन्नती मा.उच्च न्यायालयात दाखल केलेल्या रिट याचिका क्रमांक २७९७/२०१५ तसेच याचिका क्र. २९८२/२०००, २९८६/२००० व ४९५८/२००३ च्या अंतिम निकालाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्याला संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करून या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्याने पदस्थापना केलेल्या विभागात तात्काळ रूजू व्हावे.

६. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०६०२१७३९०५५१०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2017.06.02 17:36:57 +05'30'

**(इ.मु.काझी)**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,

२) मा.मुख्यमंत्र्यांचे अ.मु.स.,

३) अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई,

४) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,

५) अ.मु.स./प्रधान सचिव/ सचिव - सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग,

६) सह/उप सचिव (आस्थापना) - सर्व संबंधित मंत्रालयीन विभाग,

७) संबंधित अधिकारी , विभागामार्फत,

८) निवड नस्ती कार्या.१४.